**छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेसाठी आर्थिक वर्ष सन २०२४ -२५ करिता निधी वितरीत करण्यास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सारथी २०२४/प्र.क्र.१२४/का.१४२५-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२५.

**संदर्भ** :-

१. शासन ज्ञापन,नियोजन विभाग, क्रमांक: सारथी-२०२४/प्र.क्र.१२४/का-१४२५-अ, दिनांक ०५.०६.२०२४
२. शासन निर्णय,नियोजन विभाग, क्रमांक: सारथी-२०२३/प्र.क्र.९३/का-१४२५-अ, दिनांक ०५.०७.२०२४
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४
४. शासन ज्ञापन,नियोजन विभाग, क्रमांक: सारथी-२०२४/प्र.क्र.१२४/का-१४२५-अ, दि.१६.०९.२०२४
५. शासन निर्णय,नियोजन विभाग, क्रमांक: सारथी-२०२४/प्र.क्र.१२४/का-१४२५-अ, दि.१६.०१.२०२५
६. शासन निर्णय,नियोजन विभाग,क्रमांक: सारथी-२०२४/प्र.क्र.१२४/का.१४२५-अ, दिनांक १९.०३.२०२५
७. शासन शुध्दीपत्रक,नियोजन विभाग, क्रमांक: सारथी-२०२४/प्र.क्र.१२४/का.१४२५-अ, दिनांक २५.०३.२०२५
८. छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी),पुणे यांचे दिनांक १९.०३.२०२५ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय :-**

छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीस सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता “ओ-०२, २२२५, अनुसूचीत जाती, अनुसूचीत जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयाचे कल्याण, १०२, आर्थिक विकास (०१) मराठा, कुणबी, कुणबी मराठा, मराठा कुणबी यांचे कल्याण (०१)(०१) छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) (कार्यक्रम) (२२२५एफ ५२१)” या लेखाशिर्षांतर्गत दिनांक ०५.०६.२०२४ च्या ज्ञापनान्वये २८५.५७ लक्ष, दि.०५.०७.२०२४ च्या शासन निर्णयान्वये रु.४५.६६ कोटी,

दिनांक १६.०९.२०२४ च्या ज्ञापनान्वये रु.४९.७८ कोटी,दि.१६.०१.२०२५ च्या शासन निर्णयान्वये रु.८१.५७ कोटी व दि.२५.०३.२०२५ च्या शुध्दीपत्रकान्वये रु.३२.५८ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

२. छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांनी संदर्भ क्र.८ अन्वये मागणी केल्यानुसार खालीलप्रमाणे उद्दिष्टनिहाय अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित अनुदान | यापूर्वी वितरीत अनुदान | या आदेशान्वये वितरीत अनुदान |
|---|---|---|---|---|
| २ | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | १५०.४० | १०५.२८ | ४५.१२ |
| २ | ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीसाठी अनुदान | १३७.०० | ९५.९० | ४१.१० |
| | | | एकूण | ८६.२२ |
| अक्षरी रूपये शहाऐंशी कोटी बावीस लाख मात्र | | | | |

३. छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेसाठी सन २०२४-२५ करिता उपरोक्त एकूण रुपये ८६.२२ कोटी (अक्षरी रूपये शहाऐंशी कोटी बावीस लाख मात्र ) इतका निधी कोषागार कार्यालय यांना आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पिय नियम पुस्तिकेतील तरतुदी व सर्व अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करताना, कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्याची, तसेच सदर खर्च केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास व संबंधितांना सादर करण्याची जबाबदारी ही व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांची राहील.

तसेच याबाबत वेळोवळी खर्चाचा ताळमेळ घेवून त्याबाबतची माहिती महालेखापाल यांना महामंडळाने द्यावी. सदरचा निधी दि.३१.०३.२०२५ पर्यंत निश्चितपणे खर्च होईल याची खात्री करावी. सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात,स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही. तसेच निधी आहरित करुन बँक/स्वीय प्रपंजी खात्यात ठेवला असल्यास असा खर्च न होणारा निधी शासन खाती जमा करण्यात यावा.

४. सदर निधी खर्च करण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे तसेच आहरण संवितरण अधिकारी म्हणून मुख्य लेखा व वित्त अधिकारी, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांना घोषित करण्यात येत आहे.

५. छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीसाठी उपरोक्त बाबींसाठी होणारा खर्च हा सन २०२४-२५ साठीच्या असलेल्या"ओ-०२, २२२५, अनुसूचीत जाती, अनुसूचीत जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयाचे कल्याण, १०२, आर्थिक विकास (०१) मराठा, कुणबी, कुणबी मराठा, मराठा कुणबी यांचे कल्याण (०१)(०१) छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) (कार्यक्रम) (२२२५एफ ५२१)" या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. २२३/२०२५/व्यय ८ दिनांक २६/०३/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३ दिनांक २५.०७.२०२४ व दि.१७.०३.२०२५ च्या तरतुदीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०३२९१२०२३८१०१६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK BANSI GAIKWAD

Digitally signed by VIVEK BANSI GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2dcd8a369b90c95da2ba1482ac5185a9b5d5d8a62596d71411bc96a1a7d9bad5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1ECC1A130CD0429F39A57C63D4B57C6C3ACFCA13C103BFF9F5EF5D51BD17AD08, cn=VIVEK BANSI GAIKWAD
Date: 2025.03.29 12:34:50 +05'30'

**( विवेक ब.गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री (नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. अपर मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. अपर मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
६. प्रधान महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपुर

७. व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे
८. उप सचिव ,वित्त विभाग कार्यासन व्यय-८/अर्थ-३/अर्थ-१६
९. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१०.निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
११.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२.वरिष्ठ कोषागार अधिकारी,पुणे
१३.कार्यासन १४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती कार्यासन १४२५-अ